**महसूल विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय/ जिल्हास्तरीय/तालुकास्तरीय कार्यालयांकरीता "व्हीजन डॉक्युमेंट" आणि " वार्षिक निर्देशिका" तयार करण्याच्या अनुषंगाने शासनास अहवाल सादर करण्याकरीता समितीचे गठण करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१४९/ई-१**
मंत्रालय मुख्य इमारत, दालन क्र.१०१मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १८ जुन, २०२४

**संदर्भ :-**
१. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.संकिर्ण १०/प्र.क्र.३०६/म-५, दि.१९.७.२००२.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-०२/२०१०/प्र.क्र. १२/ई-१, दिनांक ०३.०९.२०१०.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. संकिर्ण ०२/२०१०/प्र.क्र.१२/ई-१, दि.०६.०९.२०११
४. शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण- २०२३/प्र.क्र. १४९/ई-१, दिनांक २५.०७.२०२३
५. शासन निर्णय्, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र. १४९/ई-१, दिनांक २०.१०.२०२४.
६. विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. मह-३/प्रशा/कावि/८१२/२०२४, दिनांक १२.०२.२०२४.

**शासन शुध्दीपत्रक :-**

महसूल विभागामार्फत नागरिकांना देण्यात येणा-या सेवा प्रभावीपणे राबवून नागरिकांना सेवा/ योजनांचा लाभ उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने तसेच, नागरिकांचा यामध्ये सहभाग वाढावा व योजनांची जलद गतीने अंमलबजावणी व्हावी, या उद्देशाने महसूल विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय/जिल्हास्तरीय/तालुकास्तरीय कार्यालयांकरीता " व्हीजन डॉक्युमेंट" आणि " वार्षिक निर्देशिका" तयार करण्याच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखालील संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये समिती स्थापन करण्यात आली आहे.

२. आता, सदर समितीचे सदस्य सचिव म्हणून **"जिल्हाधिकारी, पुणे"** यांचे ऐवजी **"उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त, पुणे विभाग"** अशी दुरुस्ती करण्यात येत आहे.

३. तसेच, सदर समितीने महसूल विभागामार्फत देण्यात येणा-या सेवा व कल्याणकारी योजनांना अधिकाधिक लोकाभिमुख करणे, सदर सेवा/योजनांची माहिती प्रत्येक घटकांपर्यत पोहचविण्याच्या अनुषंगाने "व्हीजन डॉक्युमेंट" आणि महसूल विभागासाठी "वार्षिक निर्देशिका" तयार करण्याकरीता गठीत करण्यात आलेल्या समितीचा अहवाल शासनास सादर करण्याकरीता **दिनांक ३० जून, २०२४ पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.**

४. सदर शासन शुध्दीपत्रक शासनाच्या www.maharashtragov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६१८१७४३१६८०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2024.06.18 18:03:31 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. विभागीय आयुक्त, पुणे.
३. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, पुणे.
४. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
६. जिल्हाधिकारी, पुणे/नागपूर/अहमदनगर/मुंबई उपनगर/बीड/अमरावती.
७. निवडनस्ती ई-१.